४०८१२१४२४७००१ - १७००

**फोर्ट, मुंबई येथील पालखीवाला इमारत कोसळून झालेल्या अपघाताबाबत चौकशी करण्यासाठी समिती नियुक्त करण्याबाबत...**

महाराष्ट्र शासन
गृहनिर्माण विभाग
शासन परिपत्रक क्रमांक - विसप्र २००३/प्र.क्र.३९/दुवपु-१
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ७ मार्च,२००३

**प्रस्तावना :-**

बृहन्मुंबई महानगरपालिका "अ" विभागाअंतर्गत, शहीद भगतसिंग मार्गावरील इमारत क्र.२९६ ही इमारत दि.२४ जानेवारी,२००३ रोजी अकस्मात कोसळली. सदर इमारत १९४० पूर्वीची असून, इमारतीच्या बांधकामासाठी त्यावेळच्या उपलब्ध साधनसामुग्रीचा वापर करुन बांधण्यात आलेली आहे. इमारतीखालील जमीन मुंबई पोर्ट ट्रस्ट यांचे नांवे असून, सदरची जमीन इमारतीसह ५० वर्षांच्या भाडेपट्टयांनी दिलेली आहे. सदर इमारतीची दुरुस्ती वारंवार करण्यात आली. तसेच धोरणाप्रमाणे महापालिका आणि म्हाडा अधिका-यांमार्फत दरवर्षी पाहणी करण्यात येते. त्या पाहणी अहवालामध्ये प्रश्नांकित इमारतीचा समावेश करण्यात आलेला नाही. तरी सुध्दा सदर इमारत अकस्मात कोसळलेली आहे. सदर इमारत का कोसळण्यात आली, याची सखोल चौकशी करण्यासाठी चौकशी अधिकारी नेमण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**परिपत्रक :-**

शहीद भगतसिंग मार्गावरील पालखीवाला या नांवाने ओळखली जाणारी इमारत क्र.२९६, उपकर क्र.अ १८९५ (१) ही इमारत दि.२४.१.२००३ रोजी मंडळामार्फत वारंवार दुरुस्ती करुनही आणि प्रचलित धोरणाप्रमाणे फेब्रुवारी ते मे या कालावधीत पाहणी करुनही अकस्मात कोसळलेली आहे. सदर इमारत आकस्मात का कोसळली आणि यासाठी कोण जबाबदार आहे, याची चौकशी करण्यासाठी श्री.ए.बी.पवार, माजी सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग यांना चौकशी अधिकारी म्हणून या परिपत्रकाद्वारे नियुक्ती करण्यात येत आहे. चौकशी अधिका-यानेआपला अहवाल तीन महिन्याच्या आत शासनास सादर करावा.

चौकशी अधिका-यास द्यावयाचे मानधनाबाबत वित्त विभागाच्या सहमतीने स्वतंत्र आदेश पारीत करण्यात येतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

(व.दा.राठोड)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे सचिव.
२. मा.मुख्यमंत्र्यांचे खाजगी सचिव
३. मा.मंत्री (गृ.नि.) यांचे खाजगी सचिव
४. मा.राज्यमंत्री (गृ.नि.) यांचे खाजगी सचिव
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर
६. महालेखापाल (लेखा परीक्षा), मुंबई/नागपूर
७. प्रधान सचिव (गृ.नि.) यांचे स्वीय सहाय्यक
८. प्रधान सचिव (वित्त विभाग) यांचे स्वीय सहाय्यक
९. प्रधान सचिव (नगर विकास विभाग) यांचे स्वीय सहाय्यक
१०. आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई- १
११. उपाध्यक्ष व मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई ४०० ०५१
१२. मुख्य अधिकारी, मुंबई इमारत दुरुस्ती व पुनर्रचना मंडळ, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई ४०० ०५१
१३. श्री.ए.बी.पवार, माजी सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, सी ५८, अभिमानश्री को.ऑ.हो.सोसायटी, ओध-पाषाण रोड, पुणे - ८
१४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१५. निवासी लेखा अधिकारी, मुंबई
१६. निवड नस्ती/दुवपु-१